**महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण व त्या अंतर्गत सर्व विभागीय मंडळांतील गट “अ” आणि गट “ब” (वर्ग-१ व वर्ग-२) संवर्गातील सर्व अधिकाऱ्यांच्या बदल्यांबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी नागरी सेवा मंडळ स्थापन करण्याबाबत.....**

**महाराष्ट्र शासन**
**गृहनिर्माण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक: बदली-२०१९/प्र.क्र.११५/गृनिभू**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
३ रा मजला, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २९ मार्च, २०२३.

वाचा :-

१) शासन निर्णय गृहनिर्माण विभाग, क्रमांक: बदली-२०१९/प्र.क्र.११५/गृनिभू, दि. २७.०५.२०२१.
२) शासन निर्णय, गृहनिार्माण विभाग, क्रमांक : बदली-२०१९/प्र.क्र. ११५/गृनिभू, दि. २०.०५.२०२२.
३) शासन निर्णय, गृहनिर्माण विभाग क्रमांक : संकीर्ण -२०२२/प्र.क्र. ११३/गृनिभू, दि. १५.०९.२०२२.

**प्रस्तावना :-**

महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण व त्या अंतर्गत सर्व विभागीय मंडळांतील गट “अ” आणि गट “ब” (वर्ग-१ व वर्ग-२) संवर्गातील सर्व अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीने करण्यात येणाऱ्या पदस्थापना तसेच, बदल्यांबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी उपरोक्त वाचा येथील शासन निर्णयांन्वये नागरी सेवा मंडळाची स्थापना करण्यात आली होती. म्हाडा प्राधिकरणांतर्गत अधिकाऱ्यांच्या बदल्या प्रस्तावित करतांना या विभागांतर्गत झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, मुंबई गृहनिर्माण क्षेत्रविकास मंडळ व मुंबई इमारत दुरूस्ती व पुनर्रचना मंडळ, मुंबई मध्ये प्रामुख्याने बदली होत असल्याने प्राधिकरण/ मंडळातील कार्यालय प्रमुखांना सदर नागरी सेवा मंडळावर घेण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याअनुषंगाने सदर नागरी सेवा मंडळामध्ये बदल करण्याचे प्रस्तावित होते.

**शासन निर्णय :-**

नागरी सेवा मंडळाची स्थापना करण्याबाबतचे उपरोक्त वाचा येथील शासन निर्णय यान्वये अधिक्रमित करण्यात येत आहेत.

२. महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण व त्या अंतर्गत सर्व विभागीय मंडळांतील गट “अ” आणि गट “ब” (वर्ग-१ व वर्ग-२) संवर्गातील सर्व अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीने करण्यात येणाऱ्या पदस्थापना तसेच,

बदल्यांबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करण्यासाठी खालीलप्रमाणे नवीन नागरी सेवा मंडळ स्थापन करण्यात येत आहे:-

**नागरी सेवा मंडळ**

| | | |
|---|---|---|
| १. | अप्पर मुख्य सचिव /प्रधान सचिव/ सचिव,गृहनिर्माण विभाग, मंत्रालय | अध्यक्ष |
| २. | उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी/म्हाडा/प्रा. | सदस्य |
| ३. | मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण | सदस्य |
| ४. | मुख्य अधिकारी, मुंबई गृहनिर्माण क्षेत्रविकास मंडळ | सदस्य |
| ५. | मुख्य अधिकारी, मुंबई इमारत दुरूस्ती व पुनर्रचना मंडळ | सदस्य |
| ६. | उप सचिव (गृनिभू), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय | सदस्य |
| ७. | अवर सचिव (गृनिभू), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय | सदस्य सचिव |

२. उपरोक्त नागरी सेवा मंडळ महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्रविकास प्राधिकरण व त्याअंतर्गत सर्व विभागीय मंडळातील गट-अ व गट-ब संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीने करण्यात येणाऱ्या पदस्थापना तसेच, बदल्यांबाबत महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन अधिनियम, २००५ मधील तरतूदीनुसार सक्षम प्राधिकाऱ्यास शिफारशी करील.

३. सदरहू शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०३२९१८२६३८६२०९ असा आहे. हे आदेश डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

LEMBHE ADITI ASHOK

Digitally signed by LEMBHE ADITI ASHOK
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOUSING DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=ceb5712400e1116fd269899721525355fdff0f1c9e88083ec7c5989cd8012199, pseudonym=B49A5EA513466592434F08BAF3686D085B1EF743, serialNumber=990DB0BB526B1091666DA553E7E0E30BE26640A64E18C3EA2EF4825D35D8EBC1, cn=LEMBHE ADITI ASHOK
Date: 2023.03.29 18:33:41 +05'30'

**(अदिती अशोक लेंभे)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :-**

१) मा. उप मुख्यमंत्री ( गृहनिर्माण) यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई -४०००३२
२) अपर मुख्य सचिव (गृहनिर्माण), गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
३) उपाध्यक्ष तथा मुख्य कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१
४) मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, वांद्रे (पुर्व), मुंबई-४०० ०५१

५) मुख्य अधिकारी, मुंबई इमारत दुरुस्ती व पुर्नरचना मंडळ, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१

६) मुख्य अधिकारी, मुंबई झोपडपट्टी सुधार मंडळ, गृहनिर्माण भवन, वांद्रे (पूर्व), मुंबई-४०० ०५१

७) सर्व मुख्य अधिकारी, मुंबई/कोकण/पुणे/नाशिक/औरंगाबाद/अमरावती/नागपूर गृहनिर्माण व क्षेत्र विकास मंडळ

८) सर्व उप सचिव, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

९) निवडनस्ती, गृनिभू कार्यासन, गृहनिर्माण विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.